**शासकीय कर्मचाऱ्यांच्या अनेक संघटनांकडून विविध कार्यासाठी जनतेकडून गोळा करण्यात येत असलेली वर्गणी व त्यामुळे बऱ्याचदा जनतेत निर्माण होत असलेली नाराजी, व यावर नियंत्रण आणण्यासाठी करावयाची उपाययोजना.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक:शामांस-१००१/प्र.क्र.७३/२००१/१६-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८.६.२००१.

**शासन परिपत्रक :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या अनेक संघटना आपल्या विविध कार्यासाठी जनतेकडून वर्गणी गोळा करीत असल्याची तक्रारी असल्याने व त्याबाबत जनतेत नाराजी निर्माण होत असल्यामुळे यावर नियंत्रण ठेवण्यासाठी काय उपाययोजना करता येईल याचा विचार करण्यासाठी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि.२८ मे, २००१ रोजी वरिष्ठ सचिव समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

शासकीय / निमशासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या सर्व मान्यताप्राप्त संघटना/महासंघ/सर्वसंघ यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, त्यांना आपल्या सदस्यांमार्फत मासिक वर्गणी घेण्याव्यतिरिक्त त्यांना सदस्यांकडून तसेच आम जनतेकडून कोणत्याही प्रकारची वर्गणी मागण्याचा अधिकार नसल्यामुळे अशी वर्गणी मागू नये. त्यांनी अशा प्रकारे वर्गणी जमा केल्यास त्या संघटनेचे पदाधिकारी व सदस्य यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ नुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल. तसेच अशी वर्गणी जमा करणे हा भारतीय दंड संहितेअन्वये गुन्हा असल्यामुळे त्या कारणास्तव त्यांच्या विरुध्द फौजदारी गुन्हा दाखल होऊ शकेल, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

मंत्रालयातील विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व शासनमान्य संघटना/महासंघ/सर्वसंघ यांच्या निदर्शनास या सूचना आणाव्यात, अशी विनंती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,.

( द. दां. देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे [illegible] सचिव,

सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* अधिकारी व कर्मचारी यांच्या सर्व मान्यताप्राप्त संघटना,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती.

* पत्राने.